**“क्यार” व “महा” चक्रिवादळामुळे आलेल्या अवेळी पावसाने नुकसान झालेल्या तालुक्यातील शेतकऱ्यांचे पाल्य असलेल्या विद्यार्थ्यांचे परीक्षा शुल्क माफ करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन परिपत्रक क्र. संकीर्ण-२०१९/प्र.क्र.३५३/तांशि-४**
मंत्रालय विस्तार भवन, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २२ नोव्हेंबर, २०१९

वाचा : १) शालेय शिक्षण विभाग, शासन निर्णय क्र.एफईडी-१५९२/१२०२/(११३२)/साशि-५, दिनांक १८/१०/१९९३
२) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक सीएलएस-२०१९/प्र.क्र.१९१/म-३, दिनांक १८ नोव्हेंबर,२०१९
३) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक एससीवाय-११/२०१९/प्र.क्र.८१/म-११, दिनांक १९ नोव्हेंबर,२०१९

**परिपत्रक :**

महसूल व वन विभागाच्या वर अनुक्रमांक २ येथील दिनांक १८ नोव्हेंबर,२०१९ च्या शासन निर्णयाव्दारे माहे ऑक्टोबर-नोव्हेंबर,२०१९ मध्ये “क्यार” व “महा” चक्रिवादळामुळे निर्माण झालेल्या परिस्थितीमुळे झालेल्या अवेळी पावसामुळे राज्यातील ३४ जिल्ह्यांतील ३२५ तालुक्यामध्ये शेतीपिकांचे व बहुवार्षिक पिकांचे नुकसान झालेल्या आपद्ग्रस्त शेतकऱ्यांना विशेष दराने मदत व सवलती देण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. या शासन निर्णयाव्दारे आपद्ग्रस्त शेतकऱ्यांना विविध सवलती जाहिर करण्यात आल्या असून त्यापैकी एक सवलत “शेतीपिकांचे नुकसान झालेल्या शेतकऱ्यांच्या पाल्यांना शाळा व महाविद्यालयीन परीक्षा शुल्कामध्ये माफी” ही आहे. याबाबत संबंधित प्रशासकीय विभागांनी आवश्यकतेनुसार सविस्तर आदेश निर्गमित करावेत व त्याबाबत आवश्यक निधीची तरतूद करुन ती माफ करण्यात यावी, अशा स्वरुपाचे आदेश देण्यात आले आहेत. त्यास अनुसरुन महसूल व वन विभागाच्या शासन निर्णयानुसार फायदा देण्याकरीता खालीलप्रमाणे आदेश सर्व विद्यापीठांना तसेच महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळास देण्यात येत आहेत :-

१) महसूल व वन विभागाच्या दिनांक १८ नोव्हेंबर,२०१९ च्या शासन निर्णयानुसार राज्यातील ३४ जिल्हयातील ३२५ तालुक्यांमधील पिकांचे व बहुवर्षीय पिकांचे नुकसान झालेल्या ज्या शेतकऱ्यांच्या पाल्यांनी शैक्षणिक वर्ष २०१९-२० मध्ये तंत्र शिक्षण संचालनालयाच्या अखत्यारितील अभ्यासक्रमांकरीता प्रवेश घेतलेला आहे अशा विद्यार्थ्यांना चालू शैक्षणिक वर्षातील परीक्षा शुल्क माफ करण्यात यावे.

२) या शासन परिपत्रकाच्या दिनांकापर्यंत ज्या विद्यार्थ्यांकडून परीक्षा शुल्क आकारण्यात आले आहे त्या विद्यार्थ्यांना परीक्षा शुल्क संबंधित संस्थेमार्फत परत करण्यात यावे.

३) या सवलतीचा लाभ केवळ आर्थिकदृष्ट्या मागास प्रवर्गातील विद्यार्थ्यांपूरता मर्यादित राहिल. राजर्षी छत्रपती शाहू महाराज शिक्षण शुल्क शिष्यवृत्ती योजनेखाली शिष्यवृत्तीसाठी पात्र असलेल्या विद्यार्थ्यांना ५०% परीक्षा शुल्क शिष्यवृत्तीच्या स्वरुपात देण्यात येत असल्याने, या योजनेखाली परीक्षा शुल्काच्या केवळ ५० % इतकी रक्कम माफ करण्यात यावी. रुपये ८.०० लाख पर्यंत कुटुंबाचे वार्षिक उत्पन्न असलेल्या उर्वरित विद्यार्थ्यांना १०० % परीक्षा शुल्काची रक्कम माफ करण्यात यावी.

४) या योजनेवरील परीक्षा शुल्क माफीसाठी विद्यार्थ्याकडून अर्ज प्राप्त करुन घेण्याची, विद्यार्थ्यास या सवलतीसाठी पात्र ठरविण्याची आणि त्याप्रमाणे विद्यापीठाकडे / मंडळाकडे परीक्षा शुल्काची मागणी करण्याची जबाबदारी संस्थेची राहिल.

५) यासाठी होणारा खर्च सर्व संबंधित विद्यापीठांनी तसेच महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळाने स्वत:च्या जमा निधीतून भागवावा.

६) हे आदेश स्वायत्त संस्थांना देखील लागू राहतील.

४. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१९११२२१६०१३१५२०८ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANJAY AUDUMBAR DHARURKAR

Digitally signed by SANJAY AUDUMBAR DHARURKAR
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=637145fd393d6d5c713e94e6da7bc6bee23011448b7fc64d138630b9c76ae7a2, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=fcf7172a73579b34fa622983d8fb647780fbef1d35a1ca975955eb9193f3f800, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SANJAY AUDUMBAR DHARURKAR
Date: 2019.11.22 17:14:53 +05'30'

**( संजय औ. धारुरकर )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. कुलसचिव, सर्व अकृषि विद्यापीठे
२. कुलसचिव, डॉ.बाबासाहेब आंबेडकर तंत्रशास्त्र विद्यापीठ, लोणेरे, जि.रायगड

**प्रत :**

१) संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) संचालक, उच्च शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३) संचालक, कला संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४) सर्व सहसंचालक, तंत्र शिक्षण, विभागीय कार्यालये.
५) सर्व उपसचिव/कार्यासन क्र.विशि-३/तांशि-३/साशि-१/ताशि-५, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
६) महसूल व वन विभाग / सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग / आदिवासी विकास विभाग / विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग / वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग /कृषि व पदुम विभाग, मंत्रालय मुंबई
७) निवड नस्ती (तांशि-४).